**परभणी जिल्हा कारागृह, परभणी येथील कारागृहाच्या शेती क्षेत्राभोवती वॉल कंपाऊंड बांधणे या कामाचे येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१४/प्र.क्र.१८४/तुरुंग-२

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ जून, २०१५

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/पजिका./कंम्पाऊंड वॉल/७६३८/कक्ष-६(३), दि.१८.०७.२०१४.

**प्रस्तावना**

परभणी जिल्हा कारागृह येथील शेती क्षेत्राची भिंत बऱ्याच ठिकाणी तुटलेली आहे. त्यामुळे कारागृहाचे प्रक्षेत्रातील शेतीपिकांचे मोकाट जनावरे व डुकरांपासून नुकसान होते. त्याचप्रमाणे बाहेरील व्यक्तींकडुन शेतमाल सुरक्षित राहत नाही. त्यामुळे कारागृहाच्या शेतातील पिकांच्या सुरक्षेच्या दृष्टीने शेती क्षेत्रास वॉल कंपाऊंडचे बांधकाम करणे आवश्यक आहे. या कामाचे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी यांनी रुपये ४०.६८ लक्ष इतक्या खर्चाचे तपासून व साक्षांकीत केलेले अंदाजपत्रके अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनाच्या प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केली आहेत. त्यास अनुसरुन याद्वारे शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

## शासन निर्णय

परभणी जिल्हा कारागृहाच्या शेतातील पिकांच्या सुरक्षेच्या दृष्टीने शेती क्षेत्रास वॉल कंपाऊंडचे बांधकाम करणे या कामाचे छाननीअंती एकूण रुपये ४२,२७,६००/- (रुपये बेचाळीस लक्ष सत्ताविस हजार सहाशे फक्त) इतक्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून शासन प्रशासकीय मान्यता देत आहे:-

१) काम सुरु करण्यापूर्वी कुंपण भिंतीचे संकल्पन सक्षम अधिकाऱ्याकडून मंजूर करुन घ्यावे.
२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम सुरु करावे.
४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही २०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सदर कामाचा खर्च कारागृह विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययामध्ये समाविष्ट करता येणे शक्य आहे याची खातरजमा करण्यात यावी.

६) तांत्रिक मान्यतेवेळी संरक्षक भिंतीच्या संकल्पचित्रास मान्यता घेऊन, मंजूर प्रकल्प मान्य किंमतीमध्येच खर्च सिमित ठेवावा.

७) अंदाजपत्रक अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी यांचे कार्यालयाकडुन तपासून घ्यावे.

२. सदरचे अंदाजपत्रक सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारित असुन, सदर अंदाजपत्रक अद्ययावत दरसूचीवर सन २०१५-१६ वर येण्यासाठी अंदाजपत्रकात जिल्हा दरसूचीत गेल्या २ वर्षात झालेल्या भाववाढीचा विचार करुन २० टक्के रकमेची तरतूद समाविष्ट करण्यात आली आहे. सदर अंदाजपत्रकात सेंटेंज चार्जेससाठी ५ टक्के, विम्यासाठी १ टक्का, आकस्मिक खर्चासाठी ५ टक्के तरतूदी समाविष्ट करण्यात आल्या आहेत.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, १०१ बांधकाम (००) (०) तुरुंग, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच,अनुक्रमांक-३, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१११११७५००२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.06.22 16:35:45 +05'30'

( र. ई. गिरी )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

प्रत,

१. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे,
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय),महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. कारागृह उपमहानिरीक्षक (मध्य विभाग), औरंगाबाद,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, नागपूर,

५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य, नागपूर,

६. कोषागार अधिकारी, परभणी,

७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी,

८. सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारती-२) मंत्रालय,मुंबई-३२,

९. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,

१०. निवडनस्ती, (तुरुंग-२)